**चिचपल्ली बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्रामध्ये कार्यशाळा इमारतीचे (Workshop Building) बांधकामासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र. ४३५/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १५ मार्च, २०१७

**वाचा :-** १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र. ४३५/फ-९, दिनांक २७.१०.२०१६

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. १/१५-१६/१५०३/२०१६-१७, दिनांक ८.११.२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्य योजनेतंर्गत सन २०१६-१७ करीता चिचपल्ली, ता.जि.चंद्रपूर येथे बांबू संशोधन केंद्राची स्थापना (४४१५ ०१९२) या योजनेकरीता रू. ५००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित आहे. चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्रामध्ये कार्यशाळा इमारतीचे (Workshop Building) बांधकामाच्या रु. १,९४,२२,४४२/- च्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने संदर्भाधीन दिनांक २७.१०.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

राज्य योजनेतंर्गत सन २०१६-१७ करीता, चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्रामध्ये कार्यशाळा इमारतीचे (Workshop Building) बांधकामासाठी रक्कम रु.१,९४,२२,४४२/- वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य योजनेतंर्गत सन २०१६-१७ करीता, चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्रामध्ये कार्यशाळा इमारतीचे (Workshop Building) बांधकामासाठी रक्कम रु.१,९४,२२,४४२/- इतका निधी (४४१५ ०१९२) या लेखाशिर्षाअंतर्गत विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१ सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गतच्या तरतूदीचा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

२ प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.

३ सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक २०.४.२०१६ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

४ सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान लेखाशिर्ष ४४१५, कृषिविषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६ वनीकरण, पंच वार्षिक योजनाअंतर्गत योजना, राज्य योजनाअंतर्गत योजना, (००४) संशोधन, (००) (०२) बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र चिचपल्ली (४४१५ ०१९२) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १७.०४.२०१५ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१६११५४५६५०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.03.16 11:56:48 +05'30'

**( प्रकाश महाजन )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनंसरक्षक (प्रा.), चंद्रपूर.

४. संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली स्थित चंद्रपूर.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.(निवडनस्ती)